**विविध विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे, संस्था, स्वायत्त संस्था इ. च्या पदविका, पदवी पदव्युत्तर पदव्यांना केन्द्र शासनाने प्रदान केलेली समकक्षता राज्य शासनाच्या सेवेसाठी लागू करणे.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आरजीडी १५११/प्र.क्र.८९/२०११/१३,
मंत्रालय, विस्तार इमारत, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :आरजीडी-१३९८/प्र.क्र.६७/९७/१३ दि. १० डिसेंबर, १९९८.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : आरजीडी १३०५/प्र.क्र.२४/२००५/१३, दि.१२ डिसेंबर, २००६.

**शासन निर्णय :-**

विद्यापीठ अनुदान आयोग मान्यताप्राप्त विद्यापीठे व संस्था यांच्या पदविका / पदव्यांना राज्यसेवेच्या पदावरील नियुक्तीसाठी मान्यता दिलेल्या विद्यापीठांची यादी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि. १० डिसेंबर, १९९८ अन्वये प्रसिध्द करण्यात आली होती. त्यानंतर सुधारीत यादी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१२ डिसेंबर, २००६ अन्वये प्रसिध्द करण्यात आली.

२. विद्यापीठ अनुदान आयोगाकडून निरंतरपणे नवीन संस्थांना, अभिमत विद्यापीठांना, मुक्त विद्यापीठांना व विद्यापीठांना मान्यता प्रदान करण्याची प्रक्रीया सुरु असते. अशा विविध विद्यापिठे / संस्थांच्या पदविका व पदव्यांना केन्द्र शासनाच्या सेवेसाठी वेळोवेळी समकक्षता प्रदान केली जाते. त्यानुसार राज्य शासनाच्या सेवेसाठी राज्य शासनाने मंजूरी दिलेल्या यादीत वारंवार सुधारणा करावी लागते. विद्यापीठ अनुदान आयोग (University Grant Commission), भारतीय विद्यापीठ संघटना (Association of Indian Universities), दुरस्त शिक्षण परिषद (Distance Education Council) व बोर्ड ऑफ असेसमेंट ऑफ एज्युकेशनल क्वॉलिफिकेशन (Board of Assessment for Educational Qualification) अशा राष्ट्रीय स्तरावरील सुस्थापित सक्षम यंत्रणा विविध अभ्यासक्रमांची समकक्षता ठरविण्यासाठी केंद्र शासनांतर्गत कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या वरील यंत्रणाद्वारे देशातील विविध संस्था, विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे यांच्या पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी यांच्या अभ्यासक्रमाची समकक्षता तपासून ती प्रदान केली जाते. केंद्र शासनाच्या सेवेसाठी अशी शैक्षणिक अर्हता ग्राहय धरली जाते. अशा प्रकारची स्वतंत्र यंत्रणा राज्य शासनाकडे कार्यरत नाही.

३. इन्स्टिटयूशन ऑफ सर्व्हेअर्स, नवी दिल्ली या संस्थेच्या (१) बिल्डींग ॲण्ड क्वॉलिटी सर्व्हेईंग (Building of Quality Surveying) (२) व्हॅल्यूएशन सर्व्हेईंग (Valuation Surveying) या दोन स्वतंत्र अभ्यासक्रमास मानव संसाधन विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), भारत सरकार यांचे क्रमांक एफ १८-२०/८३/टी-१२/टी-२/टी-१३, दि.११/७/१९८८ च्या अधिसूचनेन्वये केंद्र शासनाच्या सेवांसाठी समकक्षता

प्रदान केली आहे. तथापि, राज्य शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील आदेशात या पदवीचा समावेश नसल्यामुळे समकक्षता प्रदान करण्याची मागणी नगर विकास विभागाकडे प्राप्त झाली होती. त्यानुसार, त्याबाबतचा प्रस्ताव सदर विभागाने या विभागास सादर केला होता. याशिवाय केंद्र शासनाने प्रदान केलेली विविध पदवी / पदविकांची समकक्षता राज्य शासकीय सेवेसाठी ग्राहय धरण्याची मागणी केली जाते व त्यानुषंगाने विविध मंत्रालयीन विभागांचे प्रस्ताव या विभागाकडे प्राप्त होतात. परंतु, सदर समकक्षता राज्य शासनाच्या सेवांमधील पदांवर नियुक्तीसाठी ग्राहय धरण्याबाबत कायमस्वरुपी सर्वसमावेशक आदेश नाहीत. त्यामुळे वेगवेगळया विभागात अशा प्रकारच्या मागण्या आल्यास केवळ सर्वसमावेशक आदेशाअभावी ते नाकारले जातात. परिणामी न्यायालयीन प्रकरणे उद्‌भवतात. केंद्र शासनाप्रमाणे विविध अभ्यासक्रमांची समकक्षता तपासण्यासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभाग तसेच या विभागाकडे राज्यस्तरीय सक्षम तज्ञ यंत्रणा उपलब्ध नाही. विद्यापीठ अनुदान आयोग मान्यताप्राप्त विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे, स्वायत्त संस्था व संस्था इत्यादींच्या विविध पदविका, पदवी व पदव्युत्तर पदव्यांना केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास (शिक्षण विभाग) मंत्रालयाकडून, केंद्र शासनाच्या सेवेतील नियुक्तीसाठी वेळोवेळी प्रदान केलेली व भविष्यात प्रदान केली जाणारी समकक्षता राज्य शासनाच्या सेवेतील नियुक्तीसाठी यापुढे ग्राहय धरण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार सर्व नियुक्ती प्राधिकारी यांनी कार्यवाही करावी.

४. हे आदेश राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील विविध मंडळे, महामंडळे, स्वायत्त संस्था, संस्था इत्यादींना सुध्दा लागू राहतील. सर्व मंत्रालयीन विभागांनी हे आदेश सर्व संबंधीतांच्या निदर्शनास आणावेत. संदर्भाकीत दिनांक १० डिसेंबर, १९९८ व दि.१२ डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयासोबतच्या यादीतील मान्यताप्राप्त विद्यापीठे / संस्थांच्या पदवी /पदविकास राज्य सेवेतील पदांसाठी मान्यता दिली आहे ते आदेश कायम राहतील, त्या यादी व्यतिरिक्त विद्यापीठे /संस्था इत्यादींना केंद्र शासनाने आतापर्यंत प्रदान केलेली समकक्षता राज्य शासन सेवेसाठी येथून पुढे लागू राहील. हे आदेश या आदेशाच्या दिनांकापासून तात्काळ अंमलात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०८२३१६४८१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बा. वि. निकम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. सर्व मंत्रालयीन विभागाचे सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव
६. *प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई (* पत्राद्वारे)
७. *प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई(* पत्राद्वारे)
८. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,(* पत्राद्वारे)
९. *प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (* पत्राद्वारे)

१०. सर्व मंत्रालयीन विभाग,
११. निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१३ कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक-४२२ २२२.
१४. अवर सचिव, भारत सरकार, मानव संसाधन विकास मंत्रालय(शिक्षण विभाग), नवी दिल्ली
१५. अवर सचिव, भारत सरकार, मानव संसाधन विकास मंत्रालय(उच्च शिक्षण विभाग), नवी दिल्ली
१६. विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली
१७. भारतीय विश्वविद्यालय संघ, एआययु हाऊस, १६ कॉ. इंद्रजीत गुप्ता मार्ग, नवी दिल्ली-११० ००२
१८. दुरस्त शिक्षण परिषद, नवी दिल्ली.
१९. इन्स्टिटयूशन ऑफ सर्व्हेअर्स, सर्व्हेकशन ज्योती, बी-१५/७, कुतुंब इन्स्टिटयुशनल एरिया, न्यु मेहरोल्ली रोड, नवी दिल्ली-११० ०१६
२० बोर्ड ऑफ असेसमेंट फॉर एज्युकेशनल कॉलिफिकेशन, नवी दिल्ली
२१. सर्व विद्यापिठांचे कुलसचिव
२२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई
२३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
२४. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२५. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२८. सामान्य प्रशासन विभागातील सर्व सहसचिव, उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी
२९. सर्व विधानसभा सदस्य/सर्व विधानपरिषद सदस्य, विधानभवन, मुंबई
३०. निवड नस्ती.